नक्षलग्रस्त भागातील वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांना **विशेष सुविधा** मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - रापोसे -२२०९/प्र.क्र. ४६२/पोल-१ (अ)**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक - ०८ डिसेंबर, २००९.**

**वाचा :-** १) गृह विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरएन-०१८३/२२६३१/पोल-५ब, दि.२८.११.१९८४.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.टीआरएफ २०००/प्र.क्र.३/बारा, दि.६.८.२००२.

**प्रस्तावना :-**

नक्षलवाद्यांच्या कारवायांना पायबंद घालण्यासाठी नक्षलग्रस्त भागामध्ये पोलीस अधिकारी पुरेशा प्रमाणात उपलब्ध व्हावेत तसेच त्यांचे मनोधैर्य टिकून रहावे व या भागात काम करतांना त्यांना असलेल्या धोक्यांचा विचार करुन या पोलीस अधिकाऱ्यांना विशेष प्रोत्साहनासह सुविधा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नक्षलग्रस्त भागात काम करणाऱ्या पोलीस अधिकारी व कर्मचाऱ्यांना येणाऱ्या मानसिक ताण-तणावाचा विचार करता, तसेच तेथे काम करताना त्यांच्या जिवितास असलेल्या धोक्याचा विचार करुन त्यांचे मनोधैर्य उंचवावे म्हणून त्यांना खाली नमुद केलेल्या अतिरीक्त सोयी सवलती देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. विशेषत: अतिसंवेदनशील पोलीस ठाणी, पोलीस उप ठाणी व ॲडव्हान्स्ड आऊटपोस्ट (A.O.P.) यामध्ये कार्यरत असणाऱ्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना अधिक प्रोत्साहनाची गरज असल्याने वर नमूद परिक्षेत्रात व विशेष समितीने ठरविलेल्या कार्यक्षेत्रात नेमणूक झालेल्या सहाय्यक पोलीस अधिक्षक/ पोलीस उपअधिक्षक यांना तसेच पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, पोलीस अधिक्षक, गडचिरोली व अप्पर पोलीस अधिक्षक, गडचिरोली व अहेरी यांना खाली नमूद केलेल्या विशेष सुविधा मंजूर करण्यात येत आहेत:-

१) नक्षलग्रस्त भागातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणी, पोलीस उप ठाणी व ॲडव्हान्सड् आउट पोस्ट (A.O.P.) यामध्ये कार्यरत असणाऱ्या सरळसेवा भा.पो.से. अधिकारी, व वर नमूद अधिकाऱ्यांनी त्यांचा नक्षलग्रस्त भागातील गडचिरोली परिक्षेत्रात अडीच वर्षाचा अथवा विदर्भात तीन वर्षाचा कार्यकाल पूर्ण केल्यानंतर लगेचच त्यांची बदली त्यांच्या पसंतीच्या जिल्हयात मूळ जिल्हा (Home Town District) वगळून करण्यात यावी. यासाठी सदरहू पोलीस अधिकाऱ्यांची नक्षलग्रस्त भागात नेमणूक करण्याच्या आदेशामध्येच त्यांचा विहित कालावधी पूर्ण झाल्यानंतर कार्यमुक्त करण्यात येत असल्याचे व त्यांच्या पसंतीच्या जिल्ह्यात नियुक्ती करण्यात येत असल्याचे नमूद करण्यात यावे. नक्षलग्रस्त भागातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणी, पोलीस उप ठाणी व ॲडव्हान्सड् आउट पोस्ट (A.O.P) यामध्ये नेमणूक झालेल्या अधिकारी / कर्मचा-यांनी व वर नमुद अधिकाऱ्यांनी तेथे नेमणूक झाल्याच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत त्यांच्या पसंतीच्या जिल्ह्याबाबतची माहिती संबंधित पोलीस अधिक्षक व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविणे आवश्यक राहील.

२) नक्षलग्रस्त भागात अडीच वर्षे कार्यकाल पूर्ण केल्यानंतर बदली करताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार विहीत कार्यकाल पूर्ण होत नसल्याने सदर अधिनियमाच्या कलम ४(५) नुसार कार्यवाही करणे आवश्यक असल्याने अशी प्रकरणे बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या मान्यतेसाठी नक्षलग्रस्त भागात नियुक्तीनंतर दोन वर्ष पूर्ण झाल्याबरोबर सादर करण्यात यावीत.

३) सरळसेवेव्दारे निवड झालेले भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी तसेच पोलीस उपअधिक्षक म्हणून थेट भरती झालेल्यांना प्रशिक्षणानंतरची प्रथम नेमणूक रिक्त पदांच्या उपलब्धतेनुसार नागपूर व गडचिरोली परिक्षेत्रात करण्यात येईल.

पुढील पदावरील पदोन्नतीच्या वेळी या अधिकाऱ्यांनी नक्षलग्रस्त भागातील झालेली नेमणूक नाकारली होती किंवा कसे हे विचारात घेण्यात येईल. तसेच पुढील पदोन्नतीस पात्र होण्यासाठी गडचिरोली परिक्षेत्रात विशेष कृती दल / अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र (UOTC), गडचिरोली परिक्षेत्रातील राज्य गुप्तवार्ता विभाग या ठिकाणी सेवेचा पदावधी (Tenure) पूर्ण केल्याची बाब विचारात घेण्यात येईल.

४). अतिसंवेदनशील नक्षलग्रस्त भागातील कार्यकारी पदावरील अधिकारी/ कर्मचा-यांच्या नियुक्त्या करताना शक्यतो २३ ते ४० या वयोगटातील अधिकारी / कर्मचा-यांच्याच नियुक्त्या करण्यात याव्यात.

५) वर नमूद सर्व तरतुदी प्रथमतः दोन वर्षासाठी लागू करण्यात येत आहेत. त्यानंतर दर दोन वर्षांनी नक्षलग्रस्त क्षेत्रातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणे, पोलीस उप ठाणी व ॲडव्हान्सड आउट पोस्ट (A.O.P.) निश्चित करण्याबाबत अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून आढावा घेऊन पुढील निर्णय घेण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२०८१३२८३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र. भि. चव्हाण )

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) पोलीस महासंचालक (अभियान व विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) विशेष पोलीस महानिरीक्षक (सर्व परिक्षेत्रे)
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र - २ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/ नांदेड/ नागपूर/ चंद्रपूर/ गोंदिया/ यवतमाळ/ भंडारा.
८) पोलीस आयुक्त, नागपूर
९) पोलीस अधिक्षक, गडचिरोली/नांदेड/ नागपूर/चंद्रपूर/गोंदिया/यवतमाळ/भंडारा.
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) गृह विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव.
१५) कार्यासन- विशा-१ ब/ पोल ५ ब, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती (का.पोल-१अ).